**अपंगांच्या विशेष शाळा, कर्मशाळा प्रशिक्षण केंद्र, संलग्न वसतीगृह, मतिमंद बालगृह, शिघ्र निदान व शिघ्र उपचार केंद्राकरीता सुधारीत विशेष शाळा संहिता लागू करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय शुध्दीपत्रक क्र. इडीडी-२०१८/प्र.क्र.२८८/अ.क.१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
दिनांक :- ५ फेब्रुवारी, २०१९.

**वाचा:-** १) समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा, पर्यटन विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-१०८२/सीए-२, दिनांक १ नोंव्हेबर,१९८५.
२) समाज कल्याण, सांस्कृतिक कार्य, क्रिडा विभाग अ.शा.पत्र क्र.इडीडी/१०९०/६०५१/प्र.क्र.२४५/९६, दिनांक २७ ऑगस्ट १९९७
३) आयुक्त, अपंग कल्याण,म.रा.पुणे यांचे पत्र क्र.अकआ/सर्व प्रवर्ग/सुधारित शाळा संहिता प्रारुप/२०१८-१९/१७१८, दिनांक १३ एप्रिल,२०१८.
४) समाजिक व विशेष सहाय्य विभाग शासन निर्णय क्र.इडीडी-२०१८/सीआर-२८८/अ.क.१, दि.१८.७.२०१८.

**शासन निर्णय शुध्दीपत्रक:-**

राज्यातील सर्व शासकीय तथा स्वंयसेवी संस्थेव्दारा चालविण्यात येणाऱ्या अनुदानित अपंगाच्या विशेष शाळा, कर्मशाळा, प्रशिक्षण केंद्र, संलग्न वसतीगृह, मतिमंद बालगृह, शिघ्र निदान व उपचार केंद्र यामध्ये कार्यरत शासन मान्यता प्राप्त मुख्याध्यापक, शाळा प्रमुख, शिक्षक, निदेशक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांना सेवा शर्ती व अटी, कर्तव्य, शिस्त, वर्तणूक, अपील, सेवानिवृत्ती वेतन, वैद्यकीय प्रतिपूर्ती, अनुदान तसेच इतर सवलती लागू करण्यासाठी दि.१८.७.२०१८ च्या शासन निर्णयान्वये सोबतच्या अपंगाच्या सुधारित विशेष शाळा संहितेस मान्यता देण्यात आली आहे. सदर शाळा संहितेमध्ये सुधारणा करण्याबाबत विविध संघटना, विविध शैक्षणिक संस्था, लोकप्रतिनिधी यांचेमार्फत प्राप्त झालेली निवेदने विचारात घेऊन दि.१८.७.२०१८ अन्वये मान्यता दिलेल्या शाळा संहितेमध्ये सोबतचे प्रपत्र-अ प्रमाणे सुधारणा करण्यात येत आहेत. दि.१८.७.२०१८ च्या शासन निर्णयासोबतच्या शाळा संहितेमधील उर्वरित बाबी जशाच्या तशा लागू राहतील.

सदर शासन निर्णय शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०१९०२०७१२०१५३०३२२ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:44:26 +05'30'

**( ज्ञा.ल.सुळ )**

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे खाजगी सचिव
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे खाजगी सचिव
३) मा.मंत्री,सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई ३२.
४) मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग यांचे खाजगी सचिव
५) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य यांचे स्वीय सहायक,
६) मा. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय,मुंबई
७) आयुक्त, समाज कल्याण/अपंग कल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
८) महालेखापाल, महाराष्ट्र शासन (१/२), मुंबई, नागपूर
९) सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
१०) सर्व प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण विभाग .
११) सर्व सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण
१२) सर्व समाज कल्याण अधिकारी, जिल्हा परिषद
१३) सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
१४) निवडनस्ती (अपंग कल्याण -१)

*****

## प्रपत्र-अ

**शासन निर्णय दि.१८.७.२०१८ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या अपंग शाळा संहिता २०१८ मधील नियम व पोटनियम हे “रकाना-६” ऐवजी “रकाना-७” प्रमाणे वाचावेत.**

| अक्र<br><br>१ | प्रकरण क्रमांक<br><br>२ | भाग क्रमांक<br><br>३ | नियम<br><br>४ | पोटनियम<br><br>५ | शासन निर्णय दि.१८.७.२०१८ रोजी निर्गमित करण्यात आलेल्या अपंग शाळा संहिता २०१८ मधील पूर्वीची नमूद तरतूद<br><br>६ | शासन शुध्दीपत्रकान्वये करण्यात आलेल्या अपंग शाळा संहिता २०१८ मधील सुधारित तरतूद<br><br>७ |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | | ४ | २ | अपंग व्यक्ती अधिनियम २०१६ व सदर अधिनियम अंतर्गत शासनाकडून तयार करण्यात आलेल्या नियमानुसार व भविष्यात यामध्ये वेळोवेळी होणाऱ्या दुरुस्तीमध्ये राज्यात स्वयंसेवी संस्था मार्फत चालविल्या जाणाऱ्या उपरोक्त नियम १) मधील प्रकल्पांना नोंदणी प्रमाणपत्र हे शासनाने प्राधिकृत केलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत देण्यात येईल व त्याचे वेळोवेळी नुतनीकरण करण्यात येईल. | अपंग व्यक्ती अधिनियम २०१६ व सदर अधिनियम अंतर्गत शासनाकडून तयार करण्यात आलेल्या नियमानुसार व भविष्यात यामध्ये वेळोवेळी होणाऱ्या दुरुस्तीमध्ये राज्यात स्वयंसेवी संस्था मार्फत चालविल्या जाणाऱ्या उपरोक्त नियम १) मधील प्रकल्पांना नोंदणी प्रमाणपत्र हे शासनाने प्राधिकृत केलेल्या सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत देण्यात येईल व प्रमाणपत्राचे नुतनीकरण करतांना अ-श्रेणी प्राप्त विशेष शाळा/कर्मशाळांना ७ वर्ष, ब-श्रेणी करिता ३ वर्षाच्या मुदतीकरिता नोंदणी प्रमाणपत्र देवून त्याचे नुतनीकरण करण्यात येईल. |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:44:45 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २ | २ | | ४ | ६ | नविन नोंदणी प्रमाणपत्राचा अर्जासोबत शुल्क पोटी रुपये दोन हजार रुपये व नुतनीकरणाच्या अर्जासोबत रुपये एक हजार रक्कमेचा धनादेश नोंदणी प्रमाणपत्र देणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याच्या कार्यालयातील अहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या नावे पाठवणे बंधनकारक राहिल. | नविन नोंदणी प्रमाणपत्राचा अर्जासोबत शुल्क पोटी रुपये दहा हजार रुपये व नुतनीकरणाच्या अर्जासोबत रुपये एक हजार रक्कमेचा धनादेश नोंदणी प्रमाणपत्र देणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकाऱ्यांच्या नावे पाठवणे बंधनकारक राहिल. |
| ३ | ०२ | - | ०४ | ०८ | सदरची शाळा संहिता आमलात आल्याच्या दिनांकापासून नविन अस्थिव्यंग शाळांना कोणत्याही परिस्थितीत नव्याने मान्यता व नोंदणी प्रमाणपत्र दिले जाणार नाही. | अस्थिव्यंग शाळा बंद झाली असल्यास त्याऐवजी मतिमंद, सेरेब्रल पाल्सी, आत्ममग्न व बहुविकलांग प्रवर्गातील विशेष मुलांकरिता कार्य करणा-या संस्थंना शासन स्तरावरुन मान्यता देण्यात येईल. |
| ४ | ०२ | | ०४ | ०९ | परंतु सेरेब्रल पाल्सी विद्यार्थ्यांची उपलब्धता विचारात घेवून अस्थिव्यंग शाळांऐवजी सेरेब्रल पाल्सीने बाधित अपंग विद्यार्थ्यांचे शैक्षणिक हितसंबंध जोपासण्याच्या उदेशाने सेरेब्रल पाल्सी करिता निधीच्या उपलब्धतेनूसार नविन उपक्रम म्हणून निवासी /अनिवासी शाळांकरिता शासन मान्यता देईल. | |
| ५ | २ | | ४ | १० | परंतु सदर संहिता अंमलात येण्यापूर्वी जी अस्थिव्यंग शाळा शासन मान्यता व सक्षम प्राधिकारी यांच्याकडून नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त असेल व त्या शाळेची शासन मान्यता व नोंदणी प्रमाणपत्र अनुक्रमे शासनाने व सक्षम प्राधिकारी यांनी विहीत केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करून रद्द केलेले असेल आणि | परंतु सदर संहिता अंमलात येण्यापूर्वी जी अस्थिव्यंग शाळा शासन मान्यता व सक्षम प्राधिकारी यांच्याकडून नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त असेल व त्या शाळेची शासन मान्यता व नोंदणी प्रमाणपत्र अनुक्रमे शासनाने व सक्षम प्राधिकारी यांनी विहीत केलेल्या कार्यपध्दतीचा अवलंब करून रद्द केलेले असेल आणि शासन धोरणानुसार सदरची |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:45:07 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | शासन धोरणानुसार सदरची अस्थिव्यंग शाळा सक्षम संस्थेस हस्तांतर किंवा स्थलांतर केलेली असेल व ती सेरेब्रल पालसी मुलांसाठी शाळा चालवायला तयार असेल अशा शाळेस नियम ४ (आठ) बाधा येणार नाही. | अस्थिव्यंग शाळा सक्षम संस्थेस हस्तांतर किंवा स्थलांतर केलेली असेल व ती संस्था सेरेब्रल पालसी मुलांसाठी शाळा चालवायला तयार असेल अशा संस्थेस अस्थिव्यंग प्रवर्ग बदलून सेरेब्रल पालसी किंवा मतिमंद प्रवर्गासाठी हस्तांतरण किंवा स्थलांतरण करण्यास शाळेस/ कर्मशाळेस नियम ४ (आठ) बाधा येणार नाही. |
| ६ | ३ | १ | ११ | ११ | अपंगत्वाचे प्रमाणपत्र- प्रवेशासाठी विद्यार्थ्यांकडे अपंग व्यक्ती अधिनियम २०१६ नुसार सक्षम प्राधिकाऱ्याचे अपंगत्वाचे (मतिमंद अथवा मतिमंदत्वा सह इतर अपंगत्व) प्रमाणपत्र असावे ज्या विद्यार्थ्यांकडे प्रवेशाच्या वेळी असे प्रमाणपत्र नसेल अशा विद्यार्थ्यांला मानसशास्त्रज्ञाच्या बुध्यांक अहवालावरुन प्रवेश देण्यात यावा. मात्र सहा महिन्याच्या आत सक्षम प्राधिकाऱ्याचे अपंगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे बंधन कारक असेल. सहा महिन्याच्या आत सक्षम प्राधिकाऱ्याचे अपंगत्वाचे प्रमाणपत्र सादर न केल्यास त्याचा प्रवेश पुढे चालू ठेवता येणार नाही. प्रवेशितामध्ये हे तिव्र व अतितीव्र अपंगत्व असणाऱ्या विद्यार्थ्यांस प्राधान्य देण्यात यावे. | अपगत्वाचे प्रमाणपत्र- प्रवेशासाठी विद्यार्थ्यांकडे अपंग व्यक्ती अधिनियम २०१६ नुसार सक्षम प्राधिकाऱ्याचे अपंगत्वाचे (मतिमंद अथवा मतिमंदत्वा सह इतर अपंगत्व) प्रमाणपत्र असावे ज्या विद्यार्थ्यांकडे प्रवेशाच्या वेळी असे प्रमाणपत्र नसेल अशा विद्यार्थ्यांला मानसशास्त्रज्ञाच्या बुध्यांक अहवालावरुन/उपचार तज्ञांच्या अहवालावरून प्रवेश देण्यात यावा. मात्र सहा महिन्याच्या आत सक्षम प्राधिकाऱ्याचे अपंगत्वाचे प्रमाणपत्र सादर करणे बंधन कारक असेल. सहा महिन्याच्या आत सक्षम प्राधिकाऱ्याचे अपंगत्वाचे प्रमाणपत्र सादर न केल्यास त्याचा प्रवेश पुढे चालू ठेवावा की नाही हे मुख्याध्यापक/निम वैद्यकिय अधिकारी विद्यार्थ्यांच्या अपंगत्वाच्या परिस्थितीनुसार निर्णय घेतील परंतु नऊ महिन्याचे आत प्रमाणपत्र सादर करणे बंधनकारक राहिल. प्रवेशितामध्ये तिव्र व अतितीव्र अपंगत्व असणाऱ्या विद्यार्थ्यांस प्राधान्य देण्यात येईल. |
| ७. | ३ | १ | १५ | ४ | अस्थिव्यंगत्वासह अपंगत्व: विशेष शाळांमध्ये खालील प्रवर्गातील अपंग विद्यार्थ्यांना देखील प्रवेश देता येईल. अस्थिव्यंगत्वासह इतर अपंगत्व (अपंग व्यक्ती अधिनियम २०१६ प्रमाणे इतर अपंगत्व) | अस्थिव्यंगत्वासह अपंगत्व: विशेष शाळांमध्ये अस्थिव्यंग प्रवर्गाचे विद्यार्थी उपलब्ध न झाल्यास शासन मान्यतेने इतर अपंग प्रवर्गातील विद्यार्थ्यांना प्रवेश देय राहिल. अस्थिव्यंगत्वासह इतर अपंगत्व (अपंग व्यक्ती अधिनियम २०१६ प्रमाणे इतर अपंगत्व) |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:45:23 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ८ | ३ | ९ | ३२ | ६ | ज्या अनिवासी शाळा प्रशिक्षण केंद्राकडे स्वत:चे वाहन नसेल अशा शाळा/प्रशिक्षण केंद्रास शासनाच्या खरेदी धोरणाचे अनुपालन करून परिवहन अधिकाऱ्याकडे नोंदणी असलेले वाहन भाडे तत्वावर घेता येईल त्यावर होणारा खर्च वेतनेत्तर अनुदानात मुल्य निर्धारणासाठी देय राहिल. | ज्या अनिवासी शाळा प्रशिक्षण केंद्राकडे तसेच विद्यार्थ्यांना वैद्यकिय सेवा तातडीने उपलब्ध व्हाव्यात याकरिता आकस्मिक सेवा म्हणून निवासी विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्राकडे स्वत:चे वाहन नसेल अशा शाळा/प्रशिक्षण केंद्रास परिवहन अधिकाऱ्याकडे नोंदणी असलेले वाहन भाडे तत्वावर घेता येईल त्यावर होणारा खर्च वेतनेत्तर अनुदानात मुल्य निर्धारणासाठी देय असेल. |
| ९. | ३ | १० (०१) | ३४ | २ | शाळांमधील खालील कर्मचा-यांना दिवाळी व उन्हाळी सुटी अनुज्ञेय राहणार नाही.<br>(मुख्याध्यापक, लेखापाल, वरिष्ठ लिपीक, कनिष्ठ लिपीक, लिपीक-नि-लेखापाल, शिपाई, पहारेकरी, सफाईगार) | संबंधित संस्थेच्या व्यवस्थापनाने व शाळेच्या मुख्याध्यापक व अधिक्षक या पदावरील कर्मचा-याने प्रत्यक्ष दिवाळी सुटीच्या दिवशी शाळेत निवासी विद्यार्थी उपस्थित असतील अशावेळी अशा मुलांच्या राहण्याची, जेवणाची, काळजी घेण्याची, संरक्षण देण्याची योग्य ती उपाय योजना करून व एकुण मंजूर कर्मचा-यापैकी आळी-पाळीने प्रत्यक्ष दिवाळीच्या सुटी दिवशी डयुटी लावून कामकाज पार पाडावे. |
| १० | ३ | १० (०२) | ३६ | २ | अकुशल व्यवसाय प्रशिक्षण देणा-या प्रशिक्षण केंद्रातील खालील कर्मचा-यांना दिवाळी व उन्हाळी सुटी अनुज्ञेय राहणार नाही.<br>(व्यवस्थापक अधिक्षक, लेखापाल, वरिष्ठ लिपीक, कनिष्ठ लिपीक, लिपीक-नि-लेखापाल/ भांडारपाल, शिपाई, पहारेकरी, सफाईगार, पुनर्वसन सामाजिक कार्यकर्ता-नि सेवायोजन अधिकारी) | संबंधित संस्थेच्या व्यवस्थापनाने व प्रशिक्षण केंद्राच्या व्यवस्थापक अधिक्षक व इतर कर्मचारी यांनी प्रत्यक्ष दिवाळी सुटीच्या दिवशी शाळेत निवासी प्रशिक्षणार्थी उपस्थित असतील अशावेळी अशा प्रशिक्षणार्थींच्या राहण्याची, जेवणाची, काळजी घेण्याची, संरक्षण देण्याची योग्य ती उपाय योजना करून व एकुण मंजूर कर्मचा-यापैकी आळी-पाळीने प्रत्यक्ष दिवाळीच्या सुटी दिवशी डयुटी लावून कामकाज पार पाडावे. मात्र उन्हाळी सुट्टी अनुज्ञेय राहणार नाही. |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:45:40 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ११. | ३ | १० (२) | ३७ | १ | शाळा/प्रशिक्षण केंद्र हे दररोज १० वाजता सुरु होतील शाळेचे अध्यापनाचे कामकाज मधल्या सुटीसह दररोज ६ तास चालेल परंतु शिक्षक/शिक्षकेत्तर व पुर्ण वेळ निमवैद्यकीय कर्मचारी (उपचार तज्ञ) हे किमान ८ तास शाळेच्या कामकाजासाठी शाळेतच उपस्थित राहतील. | शिक्षणाचा हक्क अधिनियम मधील तरतूदीनुसार व शिक्षण विभागाने निश्चित केल्यानुसार शिक्षक कर्मचा-यांचे कामाचे तास राहतील. शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या व वर्ग -४ च्या कर्मचा-यांचे कामाचे तास दर दिवस कमाल ८ तास राहतील. |
| १२ | ४ | १ | ३९ | ३ | प्रत्येक वर्षी अनुदानित विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र संलग्नित वस्तीगृहातील प्रवेशितांच्या जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर महिन्याच्या बायोमॅट्रीक हजेरी प्रमाणे दर महाची सरासरी काढून त्या सरासरीप्रमाणे ऑक्टोबर महिन्यामध्ये पट निर्धारण करून त्याचे आदेश जिल्हा समाज कल्याण अधिकारी जिल्हा परिषद/सहाय्यक आयुक्त मुंबई शहर/उपनगर निर्गमित करतील. | प्रत्येक वर्षी अनुदानित विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र संलग्नित वस्तीगृहातील प्रवेशितांच्या जुलै, ऑगस्ट, सप्टेंबर महिन्याच्या हजेरी प्रमाणे दर महिन्याची सरासरी काढून त्या सरासरीप्रमाणे ऑक्टोबर महिन्यामध्ये पट निर्धारण करून त्याचे आदेश जिल्हा समाज कल्याण अधिकारी जिल्हा परिषद/सहाय्यक आयुक्त मुंबई शहर/उपनगर निर्गमित करतील व तपासणी त्रुटी आढळल्यास अहवाल आयुक्तालयास सादर करतील. |
| १३ | ४ | १ | ३९ | ५ | शासनाने अथवा आयुक्तालयाने मंजूर विद्यार्थी संख्ये पेक्षा पट निर्धारणामध्ये पदसंख्या कमी आल्यास त्या संख्येच्या प्रमाणात कमी होणारी पदे व त्या नुसार अतिरिक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांची यादी आयुक्तालयात सादर करतील. पटनिर्धारण व पद निश्चितीच्या प्रमाणे संस्थेला आस्थापनेवरील पदामध्ये कपात करावी लागेल अशी कपात करतांना याबाबत शासनाच्या प्रचलित धोरणाप्रमाणे करावी लागेल. अतिरिक्त होणाऱ्या पदावरील कर्मचाऱ्यांचे वेतन देण्याची जबाबदारी ही संस्थेची राहील. त्याची जवाबदारी शासनावर नाही याबाबत न्यायलयीन बाबी उदभवल्यास त्यास सर्वस्वी संस्था जवाबदार राहील. | शासनाने अथवा आयुक्तालयाने मंजूर विद्यार्थी केलेल्या संख्ये पेक्षा पट निर्धारणामध्ये पटसंख्या कमी आल्यास, त्या संख्येच्या प्रमाणात अतिरिक्त होणाऱ्या कर्मचाऱ्यांची यादी आयुक्तालयास सादर करतील. अतिरिक्त कर्मचाऱ्यांचे समायोजन एक महिन्याचे आत आयुक्त, अपंग कल्याण हे मंजूर रिक्त पदांवर/समकक्ष पदांवर करतील. समायोजन करतांना दिव्यांग कर्मचाऱ्यांचे प्राधान्याने समायोजन करणे अनिवार्य राहिल. समायोजन करण्यास एक महिन्यापेक्षा अधिक कालावधी लागल्यास समायोजन होईपर्यंत अतिरिक्त कर्मचाऱ्यांचे वेतन शासन मान्यतेने मुळ शाळेतून देण्यात येईल. पटनिर्धारण करतांना ८५% उपस्थिती असल्यास ती १००% ग्राह्य धरण्यात येईल. |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:45:55 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १४ | ४ | १ | ३९ | १९ | अतिरिक्त दाखल करावयाचा तपशील | विशेष शाळा/कर्मशाळेत शिक्षक संवर्गात कार्यरत असणाऱ्या शिक्षकांच्या मंजूर पदांच्या २५% पदांवरील पदवीधर शिक्षकांपैकी ज्येष्ठतेनुसार एका शिक्षकास वरिष्ठ वेतन श्रेणी अनुज्ञेय राहिल. |
| १५ | ४ | १ | ४० | ७ | सेवा भरती प्रक्रियेचा अवलंब करून निवड झालेल्या शिक्षकेत्तर संवर्गातील कर्मचाऱ्यास/समायोजित कर्मचाऱ्यास संबंधीत संस्थेने तात्काळ रुजू करून घेणे बंधनकारक राहिल. अशा प्रशासकीय मान्यतेसाठी पात्र शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यास संबंधित जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद व मुंबई शहर/उपनगर या जिल्हया करिता सहाय्यक आयुक्त समाज कल्याण हे मो कर्मचारी प्रत्यक्ष रुजू झालेल्या दिनांकापासून त्यास एक महिन्याच्या आत तपासून प्रशासकीय मान्यता देणे बंधनकारक राहील. | सरळ सेवा भरती प्रक्रियेचा अवलंब करून निवड झालेल्या शिक्षक/शिक्षकेत्तर संवर्गातील कर्मचाऱ्यास/समायोजित कर्मचाऱ्यास संबंधीत संस्थेने तात्काळ रुजू करून घेणे बंधनकारक राहिल. अशा प्रशासकीय मान्यतेसाठी पात्र शिक्षक/शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यास प्रकरण ४ भाग-१ नियम ४१ पोट नियम ५ मधील तरतूदीनुसार प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येईल. |
| १६ | ४ | १ | ४१ | ५ | सेवा भरती प्रक्रियेचा अवलंब करुन निवड झालेल्या शिक्षकेत्तर संवर्गातील कर्मचा-यास / समायोजित कर्मचा-यास संबंधीत संस्थेने तात्काळ रुजू करुन घेणे बंधनकारक राहील अशा प्रशासकीय मान्यतेसाठी पात्र कर्मचा-यास संबंधीत जिल्हयाचे मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद व मुंबई शहर / उपनगर या जिल्हयाकरिता प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण, कोकण विभाग (सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, | सेवा भरती प्रक्रियेचा अवलंब करुन निवड झालेल्या शिक्षकेत्तर संवर्गातील कर्मचा-यास / समायोजित कर्मचा-यास संबंधीत संस्थेने तात्काळ रुजू करुन घेणे बंधनकारक राहील. तृतीय श्रेणी व त्यावरील या कर्मचा-यांच्या नियुक्तीस प्रशासकीय मान्यता मिळणेबाबत संबंधीत जिल्हयाचे जिल्हा समाज कल्याण अधिकारी, मुंबई शहर व उपनगर करीता सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग हे परिपूर्ण प्रस्ताव संबंधीत विभागाच्या प्रादेशिक उपायुक्त, |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | मुंबई शहर / उपनगर) यांचेकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावाप्रमाणे तो कर्मचारी प्रत्यक्ष रुजू झाल्याच्या दिनांकापासून मान्यता देतील. | समाज कल्याण विभाग यांच्याकडे १५ दिवसांच्या आत सादर करतील व तो कर्मचारी प्रत्यक्ष रुजू झाल्याच्या दिनांकापासून १ महिन्याच्या आत प्रशासकीय मान्यता देतील. चतुर्थश्रेणी कर्मचा-यांच्या नियुक्तीस जिल्हा समाज कल्याण अधिकारी, मुंबई शहर व उपनगर करीता सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण विभाग हे प्रस्ताव परिपूर्ण असल्यास १५ दिवसांच्या आत प्रशासकीय मान्यता प्रदान करतील. |
| १७ | ४ | १ | ४३ | | पदोन्नतीने मुख्याध्यापक/व्यवस्थापक अधिक्षक पदावर नियुक्ती करताना संस्थेतील/विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्रातील सेवा जेष्ठता, मागील वर्षाच्या गोपनीय अहवालातील प्रती, संस्थेच्या ठराव विचारात घेवून पदोन्नतीने विशेष शिक्षक/निदेशक यांना मुख्याध्यापक/व्यवस्थापकीय अधिक्षक या पदावर नियुक्ती देण्यात येईल. तसेच प्रथम नियुक्तीच्या वेळी विशेष शिक्षक, प्रशिक्षण (डीएसईएमआर) प्राप्त असलेल्या कला शिक्षकास सेवा जेष्ठता व मागील पाच वर्षाच्या गोपनीय अहवालास अनुसरून मुख्याध्यापक/व्यवस्थापक अधिक्षक पदी पदोन्नती देण्यात येईल. आयुक्त अपंग कल्याण पुणे यांच्या नाहरकत प्रमाणपत्राची आवश्यकता नाही. | पदोन्नतीने मुख्याध्यापक/व्यवस्थापकीय अधिक्षक पदावर नियुक्ती करताना संस्थेतील/विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्रातील सेवा जेष्ठता, मागील वर्षाच्या गोपनीय अहवालातील प्रती, संस्थेच्या ठराव विचारात घेवून पदोन्नतीने विशेष शिक्षक/निदेशक यांना मुख्याध्यापक/व्यवस्थापकीय अधिक्षक या पदावर नियुक्ती देण्यात येईल. तसेच प्रथम नियुक्तीच्या वेळी विशेष शिक्षक, प्रशिक्षण (डीएसईएमआर, एचआयव्हीआय) प्राप्त असलेल्या कला शिक्षकास सेवा जेष्ठता व मागील तीन वर्षाच्या गोपनीय अहवालास अनुसरून मुख्याध्यापक/व्यवस्थापकीय अधिक्षक पदी पदोन्नती देण्यात येईल. पदोन्नतीस आयुक्त, अपंग कल्याण पुणे यांच्या नाहरकत प्रमाणपत्राची आवश्यकता नाही. |
| १८ | ४ | २ | ५० | अ ते ड | इतर कर्मचारी वर्गाची कर्तव्य शाळा विभाग:- पोट नियम (अ) ते (ड) हे सामाविष्ट करण्यात यावे. | ई) विशेष शिक्षक, कला शिक्षक, शारिरीक शिक्षक यापैकी एक याप्रमाणे दररोज आळीपाळीने सायं.६.०० नंतर वस्तीगृहाचे कामकाज नियमित करण्यासाठी मदत करतील. |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:46:27 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| १९ | ४ | ३ | ६६ | ५ | शास्ती:- सेवा समाप्त व अपिल:- मात्र नियम क्र.७२ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या किरकोळ स्वरुपाची शास्ती करण्याच्या योजनेनुसार निर्वाह भत्ता दिला जाईल. आणि त्यानंतर संबंधित व्यवस्थापन स्वत:च्या निधीतून भत्ता देईल. | शास्ती:- सेवा समाप्त व अपिल:- मात्र नियम क्र.७२ मध्ये विनिर्दिष्ट केलेल्या किरकोळ स्वरुपाची शास्ती करण्याच्या योजनेनुसार निर्वाह भत्ता दिला जाईल. |
| २० | ४ | ४ | ७५ | १ | अपिल व अपिलीय अधिकारी:- अपंगाकरिता स्वयंसेवी संस्था मार्फत चालविण्यात येणाऱ्या विशेष निवासी/अनिवासी अनुदानित/विनाअनुदानित शाळा/प्रशिक्षण केंद्रामधील शिक्षक शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या प्रशासकीय मान्यता, सेवा,समाप्ती, बडतर्फी, निलंबन, पदोन्नती, वेतनवाढ रोखणे, इत्यादी बाबी संदर्भात उदभवणाऱ्या या प्रश्नांच्या अनुषंगाने संबंधित व्यथीत कर्मचाऱ्यास सदर आदेश प्राप्तीच्या दिनांकापासून तीस दिवसाच्या आत संबंधित जिल्हयाच्या मुख्य कार्यकारी अधिकाऱ्याकडे/मुंबई शहर व उपनगर जिल्हयाकरिता प्रादेशिक उपायुक्त, समाज कल्याण मुंबई यांचेकडे अपिलद्वारे दाद मागता येईल. | अपिल व अपिलीय अधिकारी:- अपंगाकरिता स्वयंसेवी संस्था मार्फत चालविण्यात येणाऱ्या विशेष निवासी/अनिवासी अनुदानित/विनाअनुदानित शाळा/प्रशिक्षण केंद्रामधील शिक्षक शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या प्रशासकीय मान्यता, सेवा,समाप्ती, बडतर्फी, निलंबन, पदोन्नती, वेतनवाढ रोखणे, इत्यादी बाबी संदर्भात उदभवणाऱ्या या प्रश्नांच्या अनुषंगाने संबंधित व्यथीत कर्मचाऱ्यास सदर आदेश प्राप्तीच्या दिनांकापासून तीस दिवसाच्या आत संबंधित जिल्हयाच्या प्रादेशिक उपायुक्त समाज कल्याण विभाग यांचेकडे अपिलद्वारे दाद मागता येईल. |
| २१ | ४ | ४ | ७५ | ३ | उक्त नियम (७५) (एक) मधील तरतुदीनुसार मुदतबाहय प्राप्त झालेल्या अपिलाची संबंधित आपलीय अधिकारी दखल घेणार नाही. तथापि मुदतबाहयरित्या प्राप्त झालेल्या अपिलाची सदर अपिलीय अधिकारी दखल घेऊ शकेल परंतु अपिल दाखल करण्यास झालेला विलंब अपिलार्थीने सबळ कारणे व पुराव्यानिशी सिध्द करणे आवश्यक राहील. | उक्त नियम (७५) (एक) मधील तरतुदीनुसार मुदतबाहय प्राप्त झालेल्या अपिलाची संबंधित आपलीय अधिकारी दखल घेणार नाही. तथापि मुदतबाहयरित्या प्राप्त झालेल्या अपिलाची सदर अपिलीय अधिकारी दखल घेऊ शकेल परंतु अपिल दाखल करण्यास झालेला विलंब अपिलार्थीने सबळ कारणे व पुराव्यानिशी सिध्द करणे आवश्यक राहील. विलंबाचे कारण सिध्द न झाल्यास अपिल स्विकारता येणार नाही. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २२ | ४ | ४ | ७६ | २ व ३ | पुर्नरिक्षण अधिकारी द्वितीय अपिल प्राप्त झाल्यानंतर अर्धन्यायिक पध्दतीने अपिलावर कार्यवाही करून निर्णय अपिल करण्यास कळवतील तसेच पुर्निरिक्षण अधिकाऱ्याचा निर्णय अंतिम राहील. | हे वगळण्यात येत आहे. |
| २३ | ०५ | ०१ | ८० | ०२ | निवासी विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र सलग्न वसतिगृहाची इमारत किमान ६० चौ.फुट व कमाल १०० चौ.फुट प्रति विदयार्थी असणे आवश्यक आहे यात विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्राचे कार्यालय वर्गखोल्या स्नानगृहे, शौचालय,अभ्यांगत व कर्मचारी कक्ष सभागृह,भोजन गृह,निवास गृह इ.बाबी अंतर्भूत राहतील परंतु कमाल मर्यादेपेक्षा जास्तीच्या जागेकरीता इमारतीचे भाडे अनुज्ञेय राहणार नाही. | निवासी विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र सलग्न वसतिगृहाची इमारत किमान ६० चौ.फुट व कमाल १०० चौ.फुट प्रति विदयार्थी असणे आवश्यक आहे यात विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्राचे कार्यालय, वर्गखोल्या, स्नानगृहे, शौचालय, अभ्यांगत व कर्मचारी कक्ष सभागृह, भोजनगृह, निवासगृह इ.बाबी अंतर्भूत राहतील. परंतु अपंग विद्यार्थ्यांचे हित लक्षात घेऊन संस्थेने शिघ्र हस्तक्षेप कक्ष, व्यायाम कक्ष, ग्रंथालय, इ-लर्निंग कक्ष, उपचार कक्ष, प्रथमोपचार कक्ष, आजारी विद्यार्थ्याची स्वतंत्र निवास व्यवस्था या सारख्या सोई सुविधा इमारतीमध्ये उपलब्ध करुन दिल्यास कमाल मर्यादेपेक्षा जास्तीच्या जागेकरीता बांधकाम विभाग, जिल्हा परिषद/जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी प्रमाणित केल्याप्रमाणे मूल्यनिर्धारणामध्ये इमारत भाडे देय राहील. |
| २४ | ५ | ३ | ७९ | | अनुदान तत्वावर मान्यता असलेल्या नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त व वैधता कालावधीतील विशेष शाळा व शिक्षण क्षेत्रातील मान्यता प्राप्त पुर्णवेळ, अर्धवेळ, अंशकालीन आणि मानधन तत्वावरील कर्मचाऱ्याच्या एकूण त्या त्या वर्षात प्रत्यक्ष अदा केलेल्या वेतनाच्या ८% राहिल. | अनुदान तत्वावर मान्यता असलेल्या नोंदणी प्रमाणपत्र प्राप्त व वैधता कालावधीतील विशेष शाळा व प्रशिक्षण केंद्रातील मान्यता प्राप्त पुर्णवेळ, अर्धवेळ, अंशकालीन आणि मानधन तत्वावरील कर्मचाऱ्यांना ज्या वेतन आयोगानुसार वेतन अदा करण्यात आले असेल त्या वर्षातील प्रत्यक्ष अदा करण्यात आलेल्या एकूण वेतनाच्या ८% याप्रमाणात वेतनेत्तर अनुदानाची परिगणना करून |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:46:57 +05'30'

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | | | | वेतनेत्तर अनुदान अदा करण्यात येईल. यापूर्वी वेतनेत्तर अनुदानाची परिगणना करणेबाबत आयुक्त अपंग कल्याण यांनी निर्गमित केलेले परिपत्रके रद्द समजण्यात येतील व जिल्हा समाज कल्याण अधिकारी हे या विशेष शाळा संहितेतील उक्त तरतूदी नुसार हे वेतनेत्तर अनुदानाची सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून परिगणना करून वेतनेत्तर अनुदान अदा करतील. |
| **२५** | ५ | ३ | ७९ | १ | उक्त आकस्मिक/संकिर्ण खर्च हा एकूण ८% च्या मर्यादेत प्रत्येक शैक्षणिक बाबीवर ७०% व अशैक्षणिक बाबीवर ३०% खर्च समप्रमाणात करणे अनिवार्य राहिल. शैक्षणिक व अशैक्षणिक बाबीकरिता सोबतचे परिशिष्ठ आठ पहावे. | हे वगळण्यात येत आहे. |
| **२६** | ५ | ३ | ८० | ४ | विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र किंवा संलग्न वसतीगृहाची इमारत संस्थेच्या स्व मालकीची तसेच विनामुल्य वापरण्यास मिळालेली असल्यास कार्यकारी अभियंता सार्वजनिक बांधकाम विभाग यांनी प्रमाणित केलेल्या मुल्यांकनाच्या ७.५ टक्के (साडेसात टक्के) इमारत देखभाल/दुरुस्ती खर्च अनुदान अनुज्ञेय राहिल तथापि सदर इमारतीकरीता संस्थेंने जो प्रत्यक्ष खर्च केलेला आहे. तो किंवा मुल्यांकनाच्या ७.५ टक्के (साडेसात टक्के) या पैकी जी रक्कम कमी असेल ती रक्कम मुल्यनिर्धारणामध्ये व मान्य विदयार्थी/ प्रशिक्षणार्थीच्या प्रमाणात संस्थेस देय राहिल. | विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र किंवा संलग्न वसतीगृहाची इमारत संस्थेच्या स्व मालकीची असल्यास बांधकाम विभाग, जिल्हा परिषद/ जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांनी प्रमाणित केलेल्या मुल्यांकनाच्या ७५ टक्के इमारत भाडे अनुज्ञेय राहिल. ज्या संस्थांना विशेष शाळा/ कर्मशाळा हस्तांतरीत करण्यात आलेल्या आहेत त्या संस्थांना हस्तांतरण आदेशाच्या दिनांकापासून सुरुवातीचे ५ वर्षे १०० टक्के इमारत भाडे सन २०१७-१८ या आर्थिक वर्षापासून अनुज्ञेय राहील. तांत्रिक कारणामुळे बांधकाम विभागाने इमारत भाडे प्रमाणित करुन देण्यास असमर्थता दर्शविल्यास व सदर इमारत विद्यार्थ्यांच्या सोईची असल्यास तशी जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांची खात्री झाल्यास तात्पुरत्या स्वरुपात जिल्हा समाज कल्याण अधिकारी इमारत भाडे प्रमाणित करु शकतील. प्रमाणित केलेल्या इमारत भाडयाची रक्कम संस्थेस अनुज्ञेय राहील. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| २७ | ६ | ९ | ९० | १ | शासनमान्य मंजूर रिक्त पदांवर संस्था रुजू करून घेण्यास तयार असल्यास व शिक्षक व शिक्षकेत्तर संवर्गातील मान्यताप्रापत कर्मचाऱ्यांची बदलीसाठी विनंती असल्यास संबंधीत कर्मचा-यांचा बदली विनंती अर्ज संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी, सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण, मुंबई शहर/उपनगर यांच्यामार्फत आयुक्तालयास सादर करतील. आयुक्तालय स्तरावर विनंती अर्जाप्रमाणे यादी ठेवली जाईल व त्याप्रमाणे संबंधित कर्मचा-यास रुजू करुन घेण्यास तयार असलेल्या संस्थेद्वारा संचालीत अनुदानीत विशेष शाळा प्रशिक्षण केंद्र संलग्न वसतीगृह व बालगृहामध्ये रिक्त जागा उपलब्ध असल्यास त्या ठिकाणी आयुक्तालय स्तरावरुन बदलीचे आदेश निर्गमित केले जातील. अशा बदली झालेल्या कर्मचा-यास कार्यमुक्त करणे व रुजू करुन घेणे दोन्ही संबंधीत संस्थेस बंधनकारक राहील.बदलीचे आदेश निर्गमित करतांना दिव्यांग कर्मचा-यास विशेष प्राधान्य दिले जाईल. तसेच आवश्यक शैक्षणिक अर्हता धारण करणा-या कर्मचा-यांची समकक्ष व समान वेतन श्रेणीतील पदावर विनंती बदली प्राधान्याने करण्यात येईल. या मध्येही अंपग कर्मचा-यास विशेष प्राधान्य देण्यात येईल. | शासनमान्य मंजूर रिक्त पदांवर संस्था रुजू करून घेण्यास तयार असल्यास व शिक्षक व शिक्षकेत्तर संवर्गातील मान्यताप्राप्त कर्मचाऱ्यांने बदलीसाठी विनंती केल्यास शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचाऱ्यांच्या प्रस्तावित बदलीने विभागात बदल होत असेल तर ज्या विभागात बदली प्रस्तावित केलेली आहे त्या विभागातील संबंधीत जिल्हयाचे समाज कल्याण अधिकारी मंजूर रिक्त पदांची स्थिती बघून बदली प्रस्ताव संबंधीत विभागाच्या प्रादेशिक उपायुक्तांना सादर करतील. प्रादेशिक उपायुक्त, सह सचिव (सा.न्या.), मंत्रालय, मुंबई यांना प्रस्ताव सादर करतील व बदली करण्याचे अधिकार सह सचिव (सा.न्या.), मंत्रालय, मुंबई यांना राहतील. आंतरजिल्हा बदलीचे अधिकार आयुक्त अपंग कल्याण यांना राहतील व जिल्हयाअंतर्गत बदलीचे अधिकार जिल्हा समाज कल्याण अधिकारी यांना राहतील. अशा बदली झालेल्या कर्मचा-यास कार्यमुक्त करणे व रुजू करुन घेणे दोन्ही संबंधीत संस्थेस बंधनकारक राहील. बदलीचे आदेश निर्गमित करतांना दिव्यांग कर्मचा-यास विशेष प्राधान्य दिले जाईल. तसेच आवश्यक शैक्षणिक अर्हता धारण करणा-या कर्मचा-यांची समकक्ष व समान वेतन श्रेणीतील पदावर विनंती बदली प्राधान्याने करण्यात येईल. या मध्येही अंपग कर्मचा-यास विशेष प्राधान्य देण्यात येईल. |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| **२८** | ६ | ९ | १० | २ | विनंती बदल्याचे आदेश प्रतिवर्षी मे महिन्यामध्ये ३१ मे पूर्वी निर्गमित केले जातील | विनंती बदल्याचे व प्रशासकीय बदल्यांचे आदेश प्रतिवर्षी जून अखेरपर्यंत निर्गमित केले जातील. परंतु अपवादात्मक परिस्थितीमध्ये जून नंतरही आयुक्त अपंग कल्याण हे बदली आदेश निर्गमित करू शकतील. |
| **२९** | ६ | ९ | १० | ४ | एकाच संस्थेच्या एकापेक्षा जास्त विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र संलग्न वसतिगृह असल्यास बदल्या करण्याचे अधिकार हे संबंधित संस्थेच्या व्यवस्थापनास राहतील. अशा बदल्या शासकीय कर्मचाऱ्यांचे कर्तव्य व बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीप्रमाणे करण्यात यावे. बदली आदेश निर्गमित करण्यापूर्वी संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण मुंबई शहर/उपनगर यांची लेखी परवानगी घ्यावी. | एकाच संस्थेच्या एकापेक्षा जास्त विशेष शाळा/प्रशिक्षण केंद्र संलग्न वसतिगृह असल्यास बदल्या करण्याचे अधिकार हे संबंधित संस्थेच्या व्यवस्थापनास राहतील. अशा बदल्या शासकीय कर्मचाऱ्यांचे कर्तव्य व बदल्यांचे विनियमन अधिनियम २००५ मधील तरतुदीप्रमाणे करण्यात यावे. संस्थेने बदली आदेश निर्गमित केल्यानंतर संबंधित जिल्हा समाज कल्याण अधिकारी सहाय्यक आयुक्त, समाज कल्याण मुंबई शहर/उपनगर यांची कार्योत्तर लेखी परवानगी संस्थेस घेता येईल. |
| **३०** | ६ | ९ | १० | ८ | बदली मुळे व्यथीत झालेले कर्मचारी आयुक्त अपंग कल्याण यांचेकडे अपिल करू शकेल. | हे वगळण्यात येत आहे. |
| **३१** | **परिशिष्ट** -२ **मधील शा.नि.दि.**१८.८.२००४ | | | | महाराष्ट्र राज्याच्या विशेष **अपंग शाळा व प्रशिक्षण संहिता २०१८ परिशिष्ट २ पान क्र १२३** नुसार स्वयंसेवी संस्थामार्फत चालविण्यात येणा-या अपंगांच्या विशेष शाळा/कर्मशाळा व संलग्न वसतीगृह यामधील शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचा-यांच्या आकृतीबंध निश्चित करणेबाबतचा शासन निर्णय असून त्यामध्ये काळजीवाहक दरमहा २०००/- रुपये व त्या नंतर वेतनश्रेणी २५५० § ३२०० सफाईगार, राखनदार, मदतनीस,पहारेकरी, हि पदे मुळ वेतन अधिक देय महागाई भत्ता यांच्या ५० टक्के एवढे एकत्रित वेतनावर आहेत.. | सदरहू विषय तज्ञ समितीसमोर विचारार्थ सादर करावा. |

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: CN = Dnyandev Laxman Sul, C = IN, S = Maharashtra, O = Government Of Maharashtra, OU = Social Justice Department
Date: 2019.02.07 15:47:42 +05'30'